# सामाजिक अर्थसहाय्य योजना

(१) संजय गांधी निराधार/आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना

(२) इंदिरा गांधी निराधार व भुमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना

(३) श्रावणबाळ सेवा योजना ( राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्ती वेतन योजना)

यांच्या अंमलबजावणीबाबत **सुधारित व एकत्रित आदेश**

## महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग**

शासन निर्णय, क्रमांक साअयो-२००३/प्र.क्र.१५९/विसयो

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२, दिनांक १४ जानेवारी २००४

**प्रस्तावना**

आपल्या देशात बरेच लोक अजूनही दारिद्र्य रेषेखाली जगत आहेत. तसेच जवळ जवळ १४ टक्के लोक सर्वस्वी निराधार आहेत असे समजते. अशांच्या सामाजिक सुरक्षिततेसाठी कार्य करणे ही राज्याची जबाबदारी असते. म्हातारपणामुळे किंवा एखाद्या गंभीर स्वरूपाच्या शारीरिक विकलांगतेमुळे किंवा एखाद्या दुर्धर रोगामुळे जे लोक अगतिक बनले आहेत आणि ह्या अवस्थेतसुद्धा ज्यांना कोणताच आधार नाही अशा लोकांना निकडीने आधार देणे जरूर आहे. तसेच काही विधवा स्त्रिया निराधार तर असतातच शिवाय त्यांच्या मुलांचेही पालन पोषण करावे लागते अशांनासुद्धा आर्थिक मदतीची जरूरी असते. तसेच समाजात अन्य विविध सामाजिक कारणाने स्त्रियांची दडपशाही आणि छळवणूक होत असते आणि त्यांना समाज वेगळ्या दृष्टीने पाहतो अशा कमजोर स्त्रियांना आर्थिक आधार देणे राज्याची नैतिक जबाबदारी असते. याच अनुषंगाने समाजात अंध,अपंग व्यक्तींची पण फार कुचंबणा होते. त्याला सहाय्याचा हात देणे हा पण राज्याच्या नैतिक जबाबदारीचा भाग आहे.

निराधार, उपेक्षित पडलेली किंवा टाकून दिलेली लहान मुले किंवा किशोर अपराधांच्या बाबतीत १६ वर्षांखालील मुलगे किंवा १८ वर्षांखालील मुली यांच्या पालन पोषणाची सोय विविध सरकारी संस्थांतून केली जाते. त्यांच्यासाठी अशी सोय ही एकतर १९४८ च्या मुंबईच्या मुलांबाबत अधिनियमाच्या तरतुदींनुसार केली जाते सरकारच्या किंवा स्वयंसेवी संस्थेच्या अधिनियमांच्या तरतुदींनुसार केली जाते किंवा सरकारच्या अथवा स्वयंसेवी संस्थेच्या सामाजिक कल्याणाच्या कायद्याच्या कक्षेबाहेरील उपाय योजनानुसार केली जाते. त्यामुळे या कार्यक्रमाखाली अशा मुलांना कोणतेही स्वतंत्र आर्थिक सहाय्य देण्यासाठी या शासन निर्णयात समावेश नाही. त्याचप्रमाणे भिकारी व याचक हे भिक्षा मागण्यास प्रतिबंध करणारा अधिनियम, १९५९ च्या तरतुदीच्या कक्षेत येतात. त्यामुळे त्यांचाही विचार सामाजिक सुरक्षिततेच्या या कार्यक्रमात करता येणार नाही.

ही सर्व जबाबदारी पूर्ण करण्यासाठी राज्य शासनाने खालील योजना अमंलात आणल्या आहेत :—

(१) संजय गांधी निराधार/आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना

(२) इंदिरा गांधी निराधार व भुमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना

(३) संजय गांधी स्वावलंबन योजना

(४) राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्ती वेतन योजना

**(१) संजय गांधी निराधार/आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना**

या योजनेची सुरुवात १९८० साली करण्यात आली. सदर योजनेच्या माध्यमातून निराधार वृद्ध व्यक्ती, अंध, अपंग, शारीरिक व मानसिक आजाराने रोगग्रस्त व्यक्ती व अज्ञान मुलांच्या संगोपनाची जबाबदारी असणाऱ्या निराधार विधवांना अर्थसहाय्य देण्याच्या मूळ हेतूने ही योजना सुरू करण्यात आली. सुरुवातीस या योजने अंतर्गत प्रत्येक लाभार्थीस दरमहा रु. ६०/- एवढे अनुदान देण्यात येत होते. यामध्ये सन १९८८ मध्ये वाढ करण्यात आली व ते अनुदान रु. ६० वरून रु. १०० प्रतिमाह असे करण्यात आले. जानेवारी २००० पासून त्यामध्ये वाढ करून प्रतिमाह रु. २५० एवढे अनुदान देण्यात येत आहे. या योजनेत ६० वर्षांपेक्षा कमी वयाच्या स्त्रिया व ६५ वर्षांपेक्षा कमी वयाचे पुरुष यांना लाभ देण्यात येतो.

**(२) इंदिरा गांधी निराधार व भुमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना**

या योजनेची सुरूवात सन १९९१ पासून करण्यात आली. या योजने अंतर्गत निराधार व भूमिहिन शेतमजूर महिला, निराधार विधवा यांना अर्थसहाय्य देण्याच्या उद्देशाने ही योजना सुरू करण्यात आली. सुरुवातीस या योजने अंतर्गत प्रत्येक लाभार्थ्यास रु. १०० एवढे अनुदान देण्यात येत होते. जुलै २००० पासून रु.१०० वरून रु.२५० प्रतिमाह एवढी वाढ करण्यात आली. तेंव्हापासून त्या दराने अर्थसहाय्य देण्यात येत आहे. ही योजना केवळ महिलांसाठीच असून या योजने अंतर्गत ६० ते ६५ वयोगटातील स्त्रियांना लाभ देण्यात येतो.

**(३) संजय गांधी स्वावलंबन योजना**

ही योजना १९८० साली सुरू करण्यात आली. या योजने अंतर्गत रोजगार हमी केंद्रावर किंवा रोजगार विनिमय केंद्रावर नाव नोंदणी केलेल्या बेरोजगार व्यक्तींना स्वयंरोजगारासाठी छोटे व पिढीजात उद्योग सुरू करण्यासाठी विनातारण बिनव्याजी रु.२५०० पर्यंतच्या कमाल मर्यादेपर्यंत कर्ज दिले जाते. या कर्जाची वसुली कर्ज दिल्यापासून दोन वर्षानंतर समान आठ वार्षिक हप्त्यामध्ये करण्यात येते.

राज्य पुरस्कृत योजनांचा लाभ मिळण्यासाठी राज्य शासनाने वेळोवेळी ठरवून दिलेले लाभार्थी निवडीचे निकष, निवड प्रक्रीया व लाभ वितरण पद्धत यामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव बऱ्याच कालावधीपासून शासनाच्या विचाराधीन होता तसेच या योजनांच्या संदर्भात शासनाने **परिशिष्ट-१** मध्ये नमूद केलेले शासन निर्णय,परिपत्रके,शासन आदेश इत्यादी अधिक्रमित करून सुधारीत व एकत्रित आदेश काढण्याचा प्रस्तावही शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंबंधात शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :—

**शासन निर्णय**

**(१) संजय गांधी निराधार/आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना :**

अंध, अपंग, क्षयरोग, पक्षाघात, प्रमस्तिष्कघात, कर्करोग, एडस् यासारख्या दुर्धर शारीरिक व मानसिक आजारामुळे स्वत:चा चरितार्थ चालवू न शकणारे ६५ वर्षापेक्षा कमी वयाचे निराधार स्त्री व पुरुष यांना दरमहा रु. २५० एवढे अर्थसहाय्य दिले जाईल. एका कुटुंबात दोन लाभार्थी असल्यास रु.५००, दोन पेक्षा जास्त लाभार्थी असल्यास रु. ६२५ एवढे अर्थसहाय्य देण्यात येईल.

**(२) इंदिरा गांधी निराधार व भुमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना :**

या योजनेत ६५ वर्षे वयाच्या खालील स्त्रियांचे सर्व प्रवर्ग जसे निराधार व भूमिहिन शेतमजूर महिला, निराधार विधवा, परित्यक्त्या, घटस्फोट प्रक्रीयेतील महिला, तुरुंगात शिक्षा भोगत असलेल्या कुटुंबप्रमुख पुरुषांच्या पत्नी, अत्याचारीत महिला,वेश्या व्यवसायातून मुक्त केलेल्या स्त्रिया, अनाथ मुली यांना दरमहा रु. २५० एवढे अर्थसहाय्य त्यांचे स्थायी पुनर्वसन होईपर्यंत किंवा जास्तीत जास्त दोन वर्षापर्यंत दिले जाईल. याच लाभार्थीच्या पुनर्वसनाचे काम महिला व बालविकास विभागामार्फत करण्यात येईल.

एका कुटुंबात दोन लाभार्थी असल्यास रु.५००, दोन पेक्षा जास्त लाभार्थी असल्यास रु. ६२५ एवढे अर्थसहाय्य देण्यात येईल.

**(३) संजय गांधी स्वावलंबन योजना :**

ही योजना आता बंद करण्यात येत आहे. तथापि, सन २००२-०३ या सालापर्यंत वितरीत केलेल्या कर्जाची वसुली मात्र करण्यात यावी व त्याचे संकलित अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांनी शासनास सादर करावेत.

**(४) श्रावणबाळ सेवा योजना ( राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्ती वेतन योजना) :**

६५ वर्षाच्या वरील निराधार स्त्री व पुरुष यांना या योजने अंतर्गत रु. १७५ प्रतिमाह एवढे अर्थसहाय्य देण्यात येईल. याच लाभार्थ्यांना राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्ती वेतन योजनेमधील केंद्र शासनाच्या हिश्याची रक्कम रु. ७५ प्रतिमाहसुद्धा देण्यात येईल. असे त्याला एकूण रु. २५० प्रतिमाह अर्थसहाय्य दिले जाईल.

वरील सर्व योजनांचा लाभ देण्यासाठी लाभार्थी निवडीचे निकष, मंजुरीची प्रक्रीया, अर्थसहाय्य वितरीत करण्याचे व लाभार्थी पुनर्पडताळणीचे नियम, **परिशिष्ट-२** मध्ये नमूद केले आहेत. लाभार्थींनी द्यावयाच्या अर्जाचा नमुना, लाभार्थी निवडीसाठी तपासणी करणाऱ्या कर्मचारी/अधिकारी यांनी अर्ज करणाऱ्या व्यक्तींकडून घ्यावयाच्या प्रमाणपत्रांचे नमुने,तपासणी सूची नमूना व अर्ज मंजूर

करण्याच्या प्रक्रीयेचा नमुना इत्यादी नमुने **परिशिष्ट- ३** मध्ये देण्यात आले आहेत आणि क्षेत्रिय अधिकाऱ्याने वेळोवेळी सादर करावयाच्या अहवालांचे नमुने **परिशिष्ट-४** मध्ये देण्यात आले आहेत.

सदर शासन निर्णय दिनांक १ जानेवारी २००४ पासून अंमलात आणण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( डॉ. मुन्नालाल गौतम )
शासनाचे प्रधान सचिव.

प्रति

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व जिल्ह्यांचे पालक मंत्री
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय,भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली
अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग
प्रधान सचिव , वित्त विभाग
सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
सचिव, महिला व बालविकास विभाग
सचिव, नगरविकास विभाग
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१४/कोषा-४)
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त
सर्व महापालिका आयुक्त/सर्व पोलीस आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक/सर्व तुरुंग अधिकारी/सर्व पोलीस ठाणे
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई
विभागीय समाजकल्याण अधिकारी (मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर)
सर्व उप विभागीय उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी)/सर्व तहसीलदार/सर्व नायब तहसीलदार (संगायो)
सर्व कोषागार अधिकारी
सर्व नगरपालिकांचे मुख्य अधिकारी/सर्व सामाजिक कार्यकर्ते (महिला व बालविकास विभाग)
सर्व पंचायत समितीचे गट विकास अधिकारी
सर्व उप कोषागार अधिकारी
सर्व ग्रामपंचायती/सर्व सरपंच/सर्व पोलीस पाटील/सर्व तलाठी/सर्व ग्रामसेवक
सर्व अधिकारी, सा.न्या.सां.का.क्री.व वि.स.वि.मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती / विसयो.

## परिशिष्ट-१

(१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्र.इडीडी-३३८०/कायांसन-१०,दि. १८ सप्टेंबर, १९८०

(२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एसएलए-१०८०/५५१/आयएनडी-२, दि. २० सप्टेंबर, १९८०

(३) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. एसएनए-१०८०/स्टाफ/(६६)/१८, दि. ३ फेब्रुवारी, १९८१

(४) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्र.१०८२/१४७३/(२३१)/१८-अ, दि. २० ऑक्टोबर, १९८२

(५) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. एसजीवाय-१०८३/८०/(२६४५)/१८, दि. २ मे, १९८३

(६) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. जीवाय-१०८३/(२७९५)/का. १८, दि. १२ सप्टेंबर, १९८३

(७) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संजय गांधी योजना १०८३/(२८१५)/का. १८, दि. १५ नोव्हेंबर, १९८३

(८) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो-१०८४/ २९३२-अ/का. १८, दि. १६ फेब्रुवारी, १९८४

(९) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०८३/(२८३५)/का.१८, दि. १२ जून, १९८४

(१०) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.एसजीवाय-१०८४/(३०७९)/का. १८, दि. १२ सप्टेंबर, १९८३

(११) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.एसजीवाय-३४८६/(३५८९)/का. १७, दि.२३ नोव्हेंबर, १९८७

(१२) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०८८/सीआर-३६७३/का- १७, दि. १२ ऑक्टोबर, १९८९

(१३) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०८८/सीआर-३६७३/का-१७, दिनांक २५ ऑक्टोबर, १९९५

(१४) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०९०/सीआर-५५/का-१७, दिनांक २० जून, १९९०

(१५) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०८८/प्र.क्र.६१/का-१७, दिनांक २० जून,१९९०

(१६) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०९१/२८४/का-१७, दिनांक २४ ऑक्टोबर जून,१९९१

(१७) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्र. संगायो १०९०/सीआर ८४०/विस-१, दिनांक १ फेब्रुवारी, १९९४

(१८) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०९४/सीआर-७२/विस-१, दिनांक ६ ऑगस्ट, १९९४

(१९) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो -१०९५/प्र.क्र.२१७/का-२, दिनांक १ फेब्रुवारी,१९९६

(२०) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. डीआरएस १०९७/प्र.क्र.१०/का-२, दिनांक २ सप्टेंबर, १९९७

(२१) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९७/प्र.क्र. १२५/विस-१, दिनांक २१ ऑक्टोबर, १९९७

(२२) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९१/२८४/का. १७ दि. २४ ऑक्टोबर, १९९७

(२३) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९९/प्र.क्र. १२१/विस-१, दि. २० नोव्हेंबर, १९९९

(२४) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९९/प्र.क्र. १३४/विस-१, दि. २१ डिसेंबर, १९९९

(२५) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९९/प्र.क्र. १३४/विस-१, दि. ८ फेब्रुवारी, २०००

(२६) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९९/प्र.क्र.१३४/विस-१, दि. १५ फेब्रुवारी, २०००

(२७) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. संगायो १०९९/प्र.क्र.१४७/विस-१,दि. ८ मार्च,२०००

(२८) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. इंगायो १०९९/प्र.क्र.६५/विस-१, दि. ३ जुलै,२०००

(२९) गृह निर्माण व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. इंगायो १०२०/प्र.क्र.६५/विस-१, दि. १९ एप्रिल, २००१

(३०) सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,परिपत्रक क्र. इंगायो-१०२०/प्र.क्र.६५/विस-१, दि. १५ जून, २००१

**टीप :** राज्य शासन पुरस्कृत योजनांच्या संदर्भातील उपरोक्त शासन निर्णय, परिपत्रके व आदेशाशिवाय इतर नजरचुकीने राहिलेले असे शासन निर्णय,परिपत्रके व शासन आदेश.

## परिशिष्ट-२

## राज्य शासन पुरस्कृत सामाजिक अर्थसहाय्य योजनांचे नियम

### (१) संजय गांधी निराधार आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना

**पात्र व्यक्तींचे प्रकार :** किमान १५ वर्षांपासून महाराष्ट्र राज्याच्या रहिवासी असलेली व शासनाने, एखाद्या वित्त संस्थेने, धर्मदाय संस्थेने किंवा प्राधिकरणाने चालविलेल्या कोणत्याही संस्थेची किंवा निवासाची अंतर्वासी नसलेल्या पुढील प्रकारांत मोडणा-या व्यक्ती या नियमांनुसार आर्थिक मदत मंजूर केली जाण्यास पात्र समजण्यात येतील.

(अ) अंध, अपंग, क्षयरोग, पक्षाघात, प्रमस्तिष्कघात, कर्करोग, एड्स यासारख्या दुर्धर, शारीरिक व मानसिक आजारामुळे स्वत:ची उपजीविका चालवू न शकणाऱ्या ६५ वर्षांपेक्षा कमी वयाचे स्त्री व पुरुष.

(ब) आर्थिकदृष्ट्या निराधार असलेल्या विधवा.

### (२) इंदिरा गांधी निराधार व भूमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना

**पात्र व्यक्तींचे प्रकार :** किमान १५ वर्षांपासून महाराष्ट्र राज्याच्या रहिवासी असलेली व शासनाने, एखाद्या वित्त संस्थेने, धर्मदाय संस्थेने किंवा प्राधिकरणाने चालविलेल्या कोणत्याही संस्थेची किंवा निवासाची अंतर्वासी नसलेल्या पुढील प्रकारांत मोडणा-या व्यक्ती या नियमांनुसार आर्थिक मदत मंजूर केली जाण्यास पात्र समजण्यात येतील.

(अ) ६५ वर्षांपेक्षा कमी वयाच्या भूमिहिन शेतमजूर स्त्रिया, निराधार-विधवा, परित्यक्त्या, अत्याचारित महिला, घटस्फोट प्रक्रीयेतील स्त्रिया, कुटुंबप्रमुख पुरुष तुरुंगात शिक्षा भोगत असलेल्या व्यक्तीची पत्नी, वेश्या व्यवसायातून मुक्त केलेल्या स्त्रिया, अनाथ मुली, यांच्या व्याख्या व निवडीसाठी आवश्यक प्रमाणपत्राचा तपशील खालीलप्रमाणे राहील.

**परित्यक्त्या** म्हणजे विवाहीत स्त्री जिला पतीने सोडल्यामुळे पतीसोबत राहत नाही, स्वतंत्ररित्या किंवा इतर नातेवाईकांकडे राहते व जिचा अधिकृत घटस्फोट झालेला नाही.

**निवडीचे निकष :**

(१) ज्या स्त्रीस एक वर्षांपेक्षा अधिक कालावधीपासून पतीने सोडले आहे किंवा तिला पती नांदवत नाही व त्यामुळे अशा स्त्रीला स्वतंत्रपणे किंवा नातेवाईकाकडे रहावे लागते.

(२) वरील परिस्थितीबाबत त्या गावच्या पोलीस पाटील व सरपंच यांनी तसे प्रमाणपत्र दिले पाहिजे.

**अत्याचारीत महिला** म्हणजे समाजाच्या दुष्ट प्रवृत्तीमुळे शारीरिकदृष्ट्या छळवणूक झालेल्या अथवा बलात्कार झालेल्या स्त्रिया.

**निवडीचे निकष :**

(१) शारीरिक छळ केल्यामुळे महिलेस कुरुपता आल्यास किंवा शारीरिकदृष्ट्या अपंगत्व आल्याबाबत शासकीय वैद्यकीय अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र.

(२) बलात्कार झाल्या संबंधातील संबंधित पोलीस ठाण्यामध्ये गुन्ह्याची नोंद झाल्याचे पोलीस ठाण्याचे पत्र.

**घटस्फोट प्रक्रीयेतील स्त्रिया** ज्या पती-पत्नीने कायदेशीर घटस्फोट मिळण्यासाठी न्यायालयाकडे अर्ज केला आहे. परंतु घटस्फोट मिळण्याची अंतिम कार्यवाही झालेली नाही अशा कालावधीत पतीपासून वेगळ्या राहणाऱ्या स्त्रिया.

**निवडीचे निकष :**

(१) रितसर घटस्फोट मिळण्यासाठी पती-पत्नीने न्यायालयाकडे केलेल्या अर्जाची सत्य प्रत.

(२) अशी स्त्री पतीपासून वेगळी राहत असल्याबद्दलची संबंधित गावच्या पोलीस पाटील/सरपंचाचे प्रमाणपत्र.

**कुटुंबप्रमुख पुरुष तुरुंगात शिक्षा भोगत असलेल्या व्यक्तीची पत्नी** ज्या कुटुंबातील कर्त्या पुरुषास न्यायालयाने गुन्ह्यासाठी किंवा तपासासाठी तुरुंगात ठेवले आहे अशा पुरुषाची पत्नी एकंदरीत सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ तुरुंगात राहिल्यास अशा पुरुषाची पत्नी लाभास पात्र ठरविण्यात यावी.

**निवडीचे निकष :**

(१) पुरुष सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीपासून तुरुंगात असल्याबाबतचे तुरुंग अधिकाऱ्याचे पत्र.

(२) तपासणीसाठी पोलीस कोठडीत अथवा न्यायालयीन कोठडीत अशा पुरुषास ठेवले असल्याबाबत संबंधित पोलीस ठाण्याचे प्रमाणपत्र.

**वेश्या व्यवसायातून मुक्त केलेल्या स्त्रिया** म्हणजे पोलिसांनी वेश्या व्यवसायातून मुक्त केलेल्या स्त्रिया, ज्यांना शासनाच्या इतर विभागाच्या कोणत्याही योजनेखालील लाभ मिळत नाहीत.

**निवडीचे निकष :**

(१) पोलिसांनी वेश्या व्यवसायातून मुक्त केल्याबाबत संबंधित पोलीस ठाण्याचे प्रमाणपत्र.

(२) अशा स्त्रियांना इतर विभागाकडून लाभ मिळत नसल्याबाबतचे महिला व बाल विकास विभागांतर्गत कार्यरत असलेल्या सामाजिक कार्यकर्त्यांचे प्रमाणपत्र.

**अनाथ मुली** म्हणजे आईवडील मृत्यूमुखी पडल्यामुळे अनाथ झालेल्या व अनाथ आश्रमात न राहणाऱ्या मुली.

**निवडीचे निकष :**

(१) आईवडील मृत्यूमुखी पडल्यामुळे अनाथ असल्याबद्दलचे ग्रामपंचायतीचे/नगरपालिकेचे प्रमाणपत्र.

(२) अनाथ आश्रमामध्ये राहत नसल्याबद्दलचे त्या जिल्ह्यातील अनाथ आश्रमातील व्यवस्थापनाचे प्रमाणपत्र.

**विधवा** ज्या स्त्रिच्या पतीचे निधन झाले आहे अशी स्त्री.

**निवडीचे निकष :**

(१) पतीचे निधन झाल्याबद्दलचा संबंधित ग्रामपंचायत/नगरपरिषदेच्या मृत्यू नोंदवहीतील उतारा.

**श्रावणबाळ सेवा योजना (राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्ती वेतन योजना)**

**पात्र व्यक्तींचे प्रकार :** किमान १५ वर्षांपासून महाराष्ट्र राज्याच्या रहिवासी असलेली व शासनाने, एखाद्या वित्त संस्थेने, धर्मदाय संस्थेने किंवा प्राधिकरणाने चालविलेल्या कोणत्याही संस्थेची किंवा निवासाची अंतर्वासी नसलेल्या पुढील प्रकारांत मोडणा-या व्यक्ती या नियमांनुसार आर्थिक मदत मंजूर केली जाण्यास पात्र समजण्यात येतील.

१) ६५ वर्षे किंवा त्यापेक्षा वरील वयाचे निराधार स्त्री व पुरुष

वरील तिनही योजनांसाठी पात्र व्यक्तींना १८ वर्षांच्या खालील मुले असल्यास त्या मुलांच्या जन्माबाबतचा संबंधित ग्रामपंचायतीचा/नगरपरिषदेचा दाखला त्यांच्या अर्जासोबत जोडलेला असल्यास अशा अपत्यांना या योजनेचा लाभ देण्यात यावा. १८ वर्षांच्या वरील मुलाच्या बाबतीत ते मुल कमावते आहे किंवा नाही , असल्यास त्याच्या उत्पन्नासह त्या कुटुंबाचे उत्पन्न या योजनेच्या लाभ घेण्याच्या उत्पन्न मर्यादेपर्यंत असेल तरच त्यास लाभ देण्यात यावा. त्यासाठी स्वतंत्र अर्ज त्या सज्ञान मुलाकडून घ्यावा. असा अर्ज न आल्यास अज्ञान मुलामुळे पूर्वी मंजूर केलेला लाभ त्वरित बंद करण्यात यावा.

वरील तिनही योजनांसाठी **निराधार** ची व्याख्या खालील प्रमाणे राहिल :

ज्या व्यक्तीचे किंवा त्या व्यक्तीच्या कुटुंबाचे उत्पन्न,स्थावर/जंगम मालमत्तेपासून मिळणारे उत्पन्न किंवा नातेवाईक वा सज्ञान मुलाकडून मिळत असलेली मदत अशी सर्व एकत्रित करून त्याची कायम स्वरूपी चरितार्थ चालविण्याकरिता पुरेसे उत्पन्न नसल्यास अशा व्यक्तीस/कुटुंबास **निराधार** समजण्यात यावे. चरितार्थ चालविण्यासाठी त्या व्यक्तीच्या कुटुंबाचे एकूण उत्पन्न दारिद्र्य रेषेखालील यादीत नांव समाविष्ट होण्यासाठी आवश्यक असलेली शहरी व ग्रामीण भागातील केंद्र शासनाने वेळोवेळी ठरवून दिलेल्या उत्पन्न मर्यादेपर्यंत असावे.(शहरी व ग्रामीण भागासाठी आज ही मर्यादा रु.१५,०००/- अशी आहे.)

या सर्व योजनांसाठी वयाचा दाखला म्हणजे ग्रामपंचायतीच्या किंवा नगरपालिकेच्या जन्म नोंदवहीतील उताऱ्याची साक्षांकित प्रत, शाळा सोडल्याचा दाखला, शिधापत्रिकेमध्ये अथवा निवडणूक मतदार यादीत नमूद केलेल्या वयाचा उतारा किंवा ग्रामीण/नागरी रुग्णालयाच्या वैद्यकीय अधीक्षक यांचा किंवा त्यापेक्षा वरील दर्जाच्या शासकीय वैद्यकीय अधिकाऱ्याने दिलेला वयाचा दाखला.

**कुटुंब** म्हणजे पती/पत्नी, त्यांची जास्तीत जास्त तीन मुले.

**उत्पन्न/मिळकतीचा दाखला** म्हणजे तहसीलदार/नायब तहसीलदार किंवा मंडळ निरीक्षक यांनी तलाठी/ग्रामसेवक यांच्या शिफारशीवरून दिलेला दाखला किंवा दारिद्र्य रेषेखालील यादीमध्ये त्या व्यक्ती/कुटुंबाचा समावेश असल्याबद्दलचा सांक्षांकित उतारा.

**आर्थिक मदतीचा दर :**

संजय गांधी निराधार/आर्थिक दुर्बलांसाठी अनुदान योजना व इंदिरा गांधी निराधार व भूमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजना यामधील प्रत्येक लाभार्थ्यास प्रतिमहा रु.२५०/- अशी आर्थिक मदत देण्यात येईल. ज्या कुटुंबात दोन लाभार्थी असतील त्यांना दरमहा रु. ५०० व दोनपेक्षा जास्त लाभार्थी असल्यास अशा कुटुंबास जास्तीत जास्त रु. ६२५/- प्रतिमहा एवढे अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील.

श्रावणबाळ सेवा योजनेमधील प्रत्येक लाभार्थीस रु. १७५ एवढे अर्थसहाय्य देण्यात येईल. हेच लाभार्थी केंद्र शासनाच्या राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजनेचे लाभार्थी म्हणून गणले जावेत व त्यांना केंद्र शासनाकडून दिले जाणारे रु. ७५ प्रतिमहा एवढे निवृत्ती वेतन अनुज्ञेय राहील.

**आर्थिक मदतीचे प्रकार :**

ही आर्थिक मदत दोन प्रकारची असेल ते प्रकार म्हणजे—

(१) आजीव आर्थिक मदत आणि

(२) मर्यादित मुदतीकरिता आर्थिक मदत.

मर्यादित मुदतीसाठी द्यावयाची मदत ही काही ठराविक मुदतीकरिता असेल व त्या मुदतीनंतर म्हणजे एखादा नातेवाईक किंवा सज्ञान कमावत्या मुलाकडून विहित उत्पन्न मर्यादेपेक्षा जास्त आर्थिक मदत मिळण्यास सुरुवात होईल तेव्हा, रोग किंवा असमर्थता दूर झाल्यामुळे काम करण्यास समर्थ झाल्यास, विधवेचा पुनर्विवाह झाल्यास आर्थिक मदत बंद करण्यात यावी. इंदिरा गांधी निराधार व भूमिहिन शेतमजूर महिला अनुदान योजने अंतर्गत लाभ घेण्यासाठी नव्याने समाविष्ट करण्यात आलेल्या महिलांच्या विविध प्रवर्गातील लाभार्थींचे स्थायी पुनर्वसन होईपर्यंत किंवा जास्तीत जास्त दोन वर्षांपर्यंतच अर्थसहाय्य अनुज्ञेय राहील.

**अर्ज करण्याची पध्दत :**

(१) या नियमानुसार आर्थिक मदत मिळण्यासाठी करावयाच्या **परिशिष्ट ३** मध्ये निर्धारित केलेल्या नमुना एक मधील अर्जाच्या दोन प्रती, अर्जदार तो ज्या भागात राहत असेल त्या भागाच्या तलाठी, ग्रामसेवक, सहाय्यक ग्रामसेवक, नायब तहसीलदार/ तहसीलदार यांच्याकडे करील.

(२) अशा अर्जासोबत वर नमूद केलेल्या पात्रतेच्या अटींच्या पृष्ठ्यर्थ संबंधित कागदपत्रे व प्रमाणपत्रे जोडण्यात यावीत. नमूद केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यांकडून अशा प्रमाणपत्रांच्या व कागदपत्रांच्या दोन प्रती अर्जदाराने मिळवाव्यात.

**नायब तहसीलदार/तहसीलदार यांच्याकडे आलेल्या अर्जाची छाननी :**

संबंधित नायब तहसीलदार/तहसीलदार यांच्याकडे आलेले अर्ज, आलेल्या तारखेनुसार गुणानुक्रमे लावण्यात येतील व त्यांना संकेतांक इत्यादी देऊन झाल्यावर एका नोंदवहीमध्ये त्याची नोंद घेण्यात येईल.

अशा आलेल्या अर्जांची छाननी संबंधित तलाठी, मंडळ निरीक्षक, नायब तहसीलदार व तहसीलदार यांनी प्रत्यक्ष पडताळणी केल्यानंतर व समितीचे सदस्य सचिव म्हणजेच नायब तहसीलदार/तहसीलदार यांची सदर अर्जदार योजनेचा लाभ घेण्यासाठी पात्र ठरत असलेल्या अर्जदारांची यादी संबंधित ग्रामपंचायत किंवा शहराच्या बाबतीत प्रभाग समितीस कळवावी व अशा नावांना ग्राम सभेने/प्रभाग समितीने मान्यता दिल्यावरच असे अर्ज प्रत्येक तिमाहीस समितीपुढे निर्णयासाठी ठेवतील. समिती अस्तित्वात नसेल अशावेळी त्या सदस्य सचिव यांनी ग्राम सभा/प्रभाग सभेने मान्य केलेले अर्ज उप विभागीय उप जिल्हाधिकारी/प्रांत अधिकारी यांचे मान्यतेने प्रत्येक तीन महिन्यात असे अर्ज निकाली काढले पाहिजेत. प्रत्यक्ष तपासणीसाठी निर्धारित केलेले तपासणी नमुने **परिशिष्ट-३** मध्ये देण्यात आलेले आहेत.

(अ) **वयाचा दाखला :** ग्रामपंचायतीच्या किंवा नगरपालिकेच्या जन्म नोंदवहीतील उताऱ्याची साक्षांकित प्रत, शाळा सोडल्याचा दाखला, शिधापत्रिकेत नमूद केलेल्या **वयाच्या** उताऱ्याची साक्षांकित प्रत, निवडणूक मतदार यादीत नोंदलेल्या वयाबाबतचा उतारा, ग्रामीण/नागरी रुग्णालयातील वैद्यकीय अधीक्षक किंवा वरील दर्जाच्या शासकीय वैद्यकीय अधिकाऱ्याने दिलेल्या वयाचा दाखला.

(ब) **असमर्थतेचा/रोगाचा दाखला :** जिल्हा शल्यचिकित्सक (सिव्हील सर्जन), वैद्यकीय अधीक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये किंवा त्या महाविद्यालयाच्या संबंधित विभाग प्रमुखांनी दिलेला दाखला.

(क) **उत्पन्नाचा/मिळकतीचा दाखला :** मंडळ निरीक्षक, नायब तहसीलदार, तहसीलदार यांनी ग्रामसेवक/तलाठी यांच्या शिफारशीवरुन दिलेल्या उत्पन्नाचा दाखला.

(ड) **कोणत्याही सरकारी किंवा बिनसरकारी किंवा धर्मदाय संस्थेचा किंवा निवासगृहाचा अंतर्वासी नसल्याचा दाखला :** मंडळ निरीक्षक, नायब तहसीलदार, तहसीलदार यांनी ग्रामसेवक/तलाठी यांच्या शिफारशीवरुन दिलेला दाखला.

(ई) **रहिवासी असल्याचा दाखला :** ग्रामसेवक, तलाठी, मंडळ निरीक्षक, नायब तहसीलदार किंवा तहसीलदार यांनी दिलेला रहिवाशी असल्याबाबतचा दाखला.

**आर्थिक मदत मंजूर करणे व तिचे वितरण :**

या नियमानुसार द्यावयाची आर्थिक मदत ही त्या त्या विधानसभा क्षेत्राच्या/तालुक्याच्या संजय गांधी सामाजिक सहाय्य योजना समितीमार्फत मंजूर केली जाईल.

**संजय गांधी सामाजिक सहाय्य योजना समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-----**

| | | |
|---|---|---|
| (१) स्थानिक विधानसभा सदस्य | | अध्यक्ष |
| (२) मागासवर्गीय (अ.जा./अ.ज.) अशासकीय प्रतिनिधी (एक) | : | सदस्य |
| (३) महिला अशासकीय प्रतिनिधी (एक) | : | सदस्य |
| (४) इतर मागासवर्गीय/वि.जा.भ.ज. प्रवर्गातील अशासकीय प्रतिनिधी (दोन) | : | सदस्य |
| (५) सर्वसाधारण प्रवर्गातील अशासकीय प्रतिनिधी (एक) | : | सदस्य |
| (६) पंचायत समितीचे गट विकास अधिकारी (शासकीय प्रतिनिधी) | : | सदस्य |
| (७) नायब तहसीलदार/ तहसीलदार (शासकीय प्रतिनिधी) | : | सदस्य सचिव |

अशा समितीवर दोन शासकीय सदस्य असतील त्यांपैकी एक म्हणजे त्या तालुक्यातील पंचायत समितीचे गटविकास अधिकारी व त्या तालुक्याचे नायब तहसीलदार/तहसीलदार हे पदसिध्द सदस्य सचिव असतील. सर्व महानगरपालिका क्षेत्रामध्ये आणि 'अ' वर्ग नगरपालिका क्षेत्रामध्येसुध्दा प्रत्येक मतदार संघासाठी एक याप्रमाणे वर विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे आठ सदस्यांची एक समिती असेल. महानगरपालिकांच्या संबंधात प्रभाग अधिकारी व नगरपालिकांच्या बाबतीत मुख्य अधिकारी हे गटविकास अधिकारी यांच्याऐवजी समितीचे शासकीय सदस्य म्हणून काम पहातील.

उपरोक्त समितीमधील अध्यक्षासह इतर ५ अशासकीय प्रतिनिधींच्या नावाची शिफारस त्यावी जिल्ह्याचे पालक मंत्री यांनी ते पालक मंत्री झाल्यापासून तीन महिन्यांच्या आत जिल्हाधिकारी यांच्याकडे करावी. समितीच्या अध्यक्ष पदासाठी त्या क्षेत्राच्या विधानसभा सदस्यांचेच नाव पालकमंत्री यांनी सूचविले पाहिजे. जर त्या विधानसभा क्षेत्राच्या सदस्याचा समावेश मंत्रिमंडळामध्ये झाला असेल तर अशा विधानसभा सदस्याऐवजी त्या मंत्र्याने पालकमंत्र्यांकडे शिफारस केलेल्या इतर अशासकीय सदस्याचे नांव अध्यक्ष पदासाठी सुचवावे. मंत्री पदाची शपथ ग्रहण केल्याच्या तारखेपासून अशा विधानसभा सदस्याचे या समितीचे अध्यक्ष पद आपोआपच संपुष्टात येईल. जर जिल्ह्याच्या पालक मंत्री यांनी अशासकीय सदस्यांची नांवे तीन महिन्यांच्या आत जिल्हाधिकारी यांना दिली नाहीत तर जिल्हाधिकारी यांनी त्या त्या विधानसभा क्षेत्रातील वर उल्लेख केलेल्या प्रवर्गातील अशासकीय सदस्यांची यादी राज्याच्या विशेष सहाय्य मंत्र्यांकडे सादर करून अशा समिती गठणाची कार्यवाही जिल्हाधिकारी यांनी करावी. जिल्हाधिकारी यांच्यापेक्षा कमी दर्जाच्या अधिकाऱ्याकडून समिती गठणाचे आदेश काढण्यात येऊ नयेत. कदाचित असे आदेश ग्राह्य धरण्यात येणार नाहीत. समितीचे चुकीचे गठण आदेश झाल्यास त्यास व्यक्तिश: जिल्हाधिकारी जबाबदार राहतील. ज्यावेळी समित्यांचे गठण झालेले नसेल त्यावेळी समितीचे सदस्य सचिव म्हणजेच नायब तहसीलदार/तहसीलदार हे लाभार्थींची निवड त्यांच्या प्रांत अधिकाऱ्याच्या/उप विभागीय उप जिल्हाधिकारी यांच्या मान्यतेने करू शकतील. लाभार्थी निवडीच्या संबंधात समितीमध्ये काही मतभेद/वाद निर्माण झाल्यास समितीच्या सदस्य सचिवांनी म्हणजेच नायब तहसीलदार/तहसीलदार यांनी अशी प्रकरणे उप विभागीय उप जिल्हाधिकारी/प्रांत अधिकारी यांच्या निदर्शनास आणावीत व त्यांनी अशा प्रकरणात त्यांचा निवाडा २० दिवसांच्या आत द्यावा. उप विभागीय उप जिल्हाधिकारी यांचा निर्णय सर्वसाधारणपणे अंतिम असेल तथापि, या निर्णयामध्ये गंभीर दोष असल्याचे आढळून आल्यास अशी प्रकरणे समितीच्या सदस्य सचिव यांनी अंतिम निर्णयासाठी जिल्हाधिकारी यांच्याकडे सादर करावीत व जिल्हाधिकारी यांनी अशी प्रकरणे ३० दिवसांच्या आत निकाली काढावीत. त्यामध्ये दिलेला जिल्हाधिकारी यांचा निर्णय अंतिम राहील.

**समितीच्या बैठका :** तीन महिन्यांतून एकदा अशा समितीची एक बैठक घेण्यात यावी व त्यामध्ये अशा योजनांतर्गत आलेल्या अर्जांचा विचार करण्यात यावा. समितीच्या बैठकीसाठी ८ सदस्यांपैकी किमान ५ सदस्यांची गणपूर्तीची आवश्यकता राहील. त्यापैकी दोन शासकीय सदस्यांची उपस्थिती अनिवार्य राहील.

चुकीच्या लाभार्थींची निवड करण्यासाठी खोटे दाखले देणे किंवा खोटे दाखले स्वीकारून लाभार्थींची निवड करणे व त्याद्वारे अर्थसहाय्य वितरित करण्यास जबाबदार असणारे अशासकीय सदस्य तसेच शासकीय कर्मचारी/अधिकारी यांच्याविरुध्द भारतीय दंडसंहिते अंतर्गत फौजदारी गुन्हे जिल्हाधिकारी यांनी दाखल करावेत व व्यतिरिक्त कर्मचारी/अधिकारी यांची खातेनिहाय चौकशी सुरू करावी.

(शा.म.मु.) एच २९८८—३ (२,००,०००—२—२००४)

